उपसंचालक आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर यांच्या अधिपत्याखालील दंत चिकीत्सक विभागातील ११६ अस्थाई पदांना मुदतवाढ.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१९/प्र.क्र.१३८/आरोग्य-४,**

१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते. रुग्णालय आवार, मुंबई-४०० ००१,
तारीख: ५ ऑक्टोबर, २०१९.

वाचा

१) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः संकीर्ण-२०१२/प्र.क्र.१३०/आरोग्य-३, दि.२५.०७.२०१२.**
२) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः अपदे-२०१९/प्र.क्र.१३८/आरोग्य-४, दि.६.०६.२०१९.**
३) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.११.०९.२०१९.**
४) **संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/कक्ष ८अ/लातूर/दंतचि/अपदे -११६/१००६-१००७/१९, दि.२८.०५.२०१९.**

शासन निर्णय

उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर यांच्या अधिपत्याखालील दंत चिकीत्सक विभागातील सदर ११६ अस्थाई पदांना संदर्भाधिन अ. क्र.२ येथील दि.६.६.२०१९ च्या शासन निर्णयान्वये दि.१.०३.२०१९ ते दि.३०.०९.२०१९ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली आहे.

२. या शासन निर्णयान्वये उपसंचालक, लातूर मंडळ, लातूर यांच्या अधिपत्याखालील दंत चिकीत्सक विभागातील संदर्भाधिन क्रमांक-१ येथील दि.०६.०६.२०१९ च्या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्र "अ" मध्ये नमूद केलेल्या ११६ अस्थाई पदांना खालील अटींच्या अधीन राहून दि.१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) उपरोक्त पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नाही व ज्या कारणांसाठी पदे मंजूर केली आहेत त्या अटी व शर्तीचे पालन करण्यात आले आहे.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.११.०९.२०१९ नुसार विहित करण्यात आलेल्या अटी व शर्तीचे कटाक्षाने पालन करण्यात यावे व त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी. त्याचप्रमाणे कार्यालयाचा पदविषयक सुधारित आकृतिबंध उच्चस्तरीय समितीकडून अंतिमत: मान्य करुन घेण्याबाबत तात्काळ कार्यवाही करण्यात यावी.
३) विहीत मुदतीत पदांच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण न झाल्यास अस्थायी पदांना त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी / कर्मचारी यांच्या वेतन व भत्ताचा प्रश्न निर्माण झाल्यास त्याची जबाबदारी संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांची राहील.

३. सदर प्रस्तावावरील खर्च, मागणी क्रमांक.आर-१, मुख्य लेखाशीर्ष "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य, ००१-संचालक व प्रशासन, ००१ (०८) प्राथमिक आरोग्य केंद्राचा ग्रामीण

रुग्णालयाइतका दर्जा वाढविणे, (२२१० ०४१३)" व मागणी क्रमांक.आर-१, मुख्य लेखाशीर्ष "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०३-ग्रामीण आरोग्य सेवा विषम चिकित्सा, ११०-रुग्णालये व दवाखाने, (०१) इतर रुग्णालये व दवाखाने (०१) (०१) - कुटीर रुग्णालये (अनिवार्य) (२२१० ०३१५)" या लेखाशीर्षाखालील सन २०१९-२० च्या मंजूर अनुदानामधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.११.०९.२०१९ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०९३०१२५११२१६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c94703436c07cda664672d20607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b869fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2019.10.05 17:07:42 +05'30'

**(प्र.मो.बलकवडे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा-२, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
५. सहसंचालक, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
७. सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा ( लेखा व लेखापरिक्षा ), पुणे,
८. उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर,
९. जिल्हा शल्य चिकित्सक, लातूर,
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर,
११. जिल्हा आरोग्य अधिकारी, लातूर,
१२. वित्त विभाग (व्यय-१३, अर्थसंकल्प-१९ ), मंत्रालय, मुंबई,
१३. अवर सचिव ( सेवा-२/ सेवा-३/ सेवा-५ /अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.